विशाल प्रकल्पांना रोजगाराच्या निकषाऐवजी गुंतवणुकीच्या निकषावर प्रोत्साहने देणे, औद्योगिक प्रकल्पांना विशाल /अति विशाल प्रकल्पाचा दर्जा व प्रचलित विशाल प्रकल्प धोरणानुसार शासनाने ठरवून दिलेल्या मर्यादेत (As per Template) प्रोत्साहने मंजूर करणे, विशाल / अति विशाल प्रकल्पाने केंद्रीय विक्रीकराची रक्कम ज्या दराने भरणा केली असेल ती रक्कम औद्योगिक विकास अनुदानाकरिता पात्र धरण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मंउस-२०१५/प्र.क्र. ११/उद्योग-८,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक ५/३/२०१५

**वाचा:-**

१) शासन निर्णय, उ.ऊ.व का.वि. क्रमांक-आयडीएल-१००४/प्र.क्र.३१८/उद्योग-८, दिनांक २४/१२/२००४.

२) शासन निर्णय, उ.ऊ.व का.वि. क्रमांक-आयडीएल-१००५/प्र.क्र. ११९/उद्योग-८, दिनांक २ जून, २००५.

३) शासन निर्णय, उ.ऊ.व का. वि. क्रमांक- पीएसआय-१७०७/प्र.क्र.५०/उद्योग-८, दिनांक २२/३/२०११.

४) शासन निर्णय, उ. ऊ.व का.वि. क्रमांक-पीएसआय-१७०७/प्र.क्र.५०/उद्योग-८, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०११.

५) शासन निर्णय, उ.ऊ.व का.वि. क्रमांक- साप्रोयो-२०१३/प्र.क्र. १२१/उद्योग-८, दिनांक ३/३/२०१४.

**प्रस्तावना :-**

सामूहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत राज्यात नव्याने अथवा विस्तारीकरणाव्दारे गुंतवणूक करणाऱ्या विशाल प्रकल्पांना अधिकाधिक विशेष प्रोत्साहने/सवलती किती व कोणत्या स्वरुपाची द्यावीत याबाबत प्रकरणनिहाय निर्णय घेण्यासाठी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग- क्रमांक-आयडीएल-१००५/प्र.क्र. ११९/उद्योग-८, दिनांक २ जून, २००५ अन्वये मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली

उच्चाधिकार समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीस वेळोवेळी शासनाने अधिकार प्रदान केले आहेत. सदर समिती दिनांक ३/३/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात आली आहे.

तसेच विशाल व अतिविशाल प्रकल्पांच्या संदर्भात विशाल प्रकल्पांना एकत्रित अधिकची प्रोत्साहने/सवलती देण्याच्या प्रस्तावावर निर्णय घेण्यासाठी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४/१२/२००४ च्या आदेशान्वये मंत्रिमंडळ उप समिती गठीत करण्यात आली आहे. विशाल / अतिविशाल प्रकल्पांसंदर्भात प्रकल्पांनी मागणी केल्यास रोजगाराच्या निकषाऐवजी गुंतवणुकीच्या निकषावर प्रोत्साहने देणे, औद्योगिक प्रकल्पांना विशाल /अति विशाल प्रकल्पाचा दर्जा व प्रचलित विशाल प्रकल्प धोरणानुसार शासनाने ठरवून दिलेल्या मर्यादेत (As per Template) प्रोत्साहने मंजूर करणे, विशाल / अति विशाल प्रकल्पाने केंद्रीय विक्रीकराची रक्कम ज्या दराने भरणा केली असेल ती रक्कम औद्योगिक विकास अनुदानाकरिता पात्र धरणे या बाबी शासनाच्या विचाराधीन होत्या. त्यास अनुसरुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सामूहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत विशाल व अतिविशाल प्रकल्पांच्या बाबतीत मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली असलेल्या मंत्रिमंडळ उप समितीने घेतेलेल्या निर्णयानुसार खालील प्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) उच्चाधिकार समितीने रोजगाराच्या निकषावर प्रोत्साहने मंजूर केलेल्या विशाल प्रकल्पाने रोजगाराच्या निकषाऐवजी गुंतवणुकीच्या निकषावर प्रोत्साहने देण्याची मागणी केल्यास अशी प्रकरणे उच्चाधिकार समितीसमोर सादर करण्याऐवजी उद्योग विभागाने त्यांचे स्तरावर निकाली काढण्यासाठी प्रधान सचिव (उद्योग) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२) औद्योगिक प्रकल्पांना विशाल /अतिविशाल प्रकल्पाचा दर्जा देणे व प्रचलित विशाल प्रकल्प धोरणानुसार शासनाने ठरवून दिलेल्या मर्यादेत (As per Template) प्रोत्साहने मंजूर करण्याचे अधिकार उच्चाधिकार समिती ऐवजी प्रधान सचिव (उद्योग) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३) विशाल / अतिविशाल प्रकल्पांच्या शासनाने ठरवून दिलेल्या प्रोत्साहनापेक्षा अधिकच्या सवलती / प्रोत्साहने देण्याची मागणी असल्यास अशा मागण्या उच्चाधिकार समितीच्या

विचारार्थ सादर करण्यात येतील व उच्चाधिकार समितीच्या शिफारशीसह मंत्रिमंडळ उप समितीस सादर करण्यात येतील.

४) विशाल / अति विशाल प्रकल्पाने केंद्रीय विक्रीकराची रक्कम ज्या दराने भरणा केली असेल ती रक्कम औद्योगिक विकास अनुदानाकरिता पात्र धरण्याची मागणी केल्यास अशी प्रकरणे उच्चाधिकार समितीसमोर सादर करण्याऐवजी उद्योग विभागाने त्यांचे स्तरावर निकाली काढण्यासाठी प्रधान सचिव (उद्योग) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०३१०१५१४४५३७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2015.03.10 15:25:09 +05'30'

**( संजय इंगळे )**
उप सचिव
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मंबई
२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (नगर विकास-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC), मुंबई
९) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई

१०) विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई

११) मा. मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१२) मा. मंत्री (वित्त)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१३) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१४) मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१५) निवड नस्ती (उद्योग-८)